सन २०१७ ते २०१९ या ३ वर्षांच्या
कालावधीमध्ये ५० कोटी वृक्ष लागवड, संगोपन
आणि देखभाल या कार्यक्रमांतर्गत निश्चित
केलेल्या उद्दिष्टानुसार वर्षनिहाय नियोजन
आराखडा व कृती कार्यक्रम तयार करुन
अंमलबजावणी करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण २०१६/प्र.क्र.३६४/एस.एम.१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १ मार्च, २०१७

वाचा :

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: सावvि-२०१५ /प्र.क्र.१३१/ फ-११, दिनांक ३१.०३.२०१६.
२) शासन परिपत्रक शालेय शिक्षण क्रमांकः संकीर्ण १११६/ प्र.क्र.१३२/एस.एम.१, दिनांक १०.०५.२०१६
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: सावvि-२०१६/प्र.क्र.८०/फ-११, दिनांक १०.१०.२०१६

शासन परिपत्रक :

१. जागतिक तापमानातील वाढ, हवामान आणि ऋतू बदल याची दाहकता आणि तीव्रता कमी करण्यासाठी मोठया प्रमाणात वृक्ष लागवड हाती घेण्याचे महत्त्व वैश्विक स्तरावर मान्य झालेले आहे. ह्या उपक्रमाचा भाग म्हणून दि. १ जुलै, २०१६ रोजी एकाच दिवशी २ कोटी वृक्ष लागवड करण्याचा महत्वाकांक्षी आणि धडक कार्यक्रम शासनाने हाती घेतला होता. याबाबत संदर्भाधीन क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये आदेश दिले होते. वृक्षलागवडीच्या कार्यकमात शालेय शिक्षण व क्रीडा विभागासह अन्य शासकीय विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालये सहभागी झाले होते. त्याचबरोबर शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या क्षेत्रिय यंत्रणांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सविस्तर सूचना संदर्भाधीन क्र.(२) येथील शासन परिपत्रकान्वये देण्यात आल्या होत्या.

२. सर्व शासकीय विभाग, कार्यालये व जनता इ. च्या स्वयंस्फुर्त सहभागामुळे राज्यात २ कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट सहज पूर्ण होऊ शकले. दि.१ जुलै रोजी एकंदर २.८२ कोटी वृक्ष लागवड करण्यात आली. हा कार्यक्रम लोकचळवळीत रूपांतरीत करण्यामध्ये शासनास यश प्राप्त झाले आहे. राज्यात वन विभागामार्फत राबविण्यात आलेल्या २ कोटी वृक्षारोपण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीबाबत मा. पंतप्रधान यांनीदेखील दि. ३१ जुलै, २०१६ रोजीच्या मन की बात या रेडिओवरून प्रसारित होणाऱ्या कार्यक्रमामध्ये अभिनंदन केले. तसेच यापुढील वर्षांमध्ये हाती घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमाबाबतही सूतोवाच करुन निरनिराळया धर्मग्रंथामध्ये नमूद वृक्ष लागवडीचे महत्त्व विशद केले. वृक्ष लागवडीच्या कार्यक्रमात सातत्य ठेवण्याबाबत त्यांनी आवाहन केले. त्याचप्रमाणे लिम्का बुक ऑफ रेकॉर्ड या संस्थेने या अभिनव उपक्रमाची नोंद घेऊन राज्य शासनास प्रमाणपत्र दिले आहे. सर्वांच्या एकत्रित प्रयत्नामुळे हा आगळावेगळा उपक्रम राबविणे शक्य झाले आहे.

३. ब्राझील मधील रिओ दि जानेरो येथे २०१६ च्या ऑलीम्पिक स्पर्धा संपन्न झाल्या. या स्पर्धांच्या उदघाटन समारंभामध्ये, वृक्षलागवड, पर्यावरणाचे रक्षण आणि जागतिक तापमानात होणाऱ्या वाढीची तीव्रता कमी करणे (Mitigation of Global Warming) इत्यादीचे महत्त्व विशद करणाऱ्या संदेशांचे सादरीकरण करुन या स्पर्धेची सुरूवात करण्यात आली. यावेळी दिलेले संदेश पुढीलप्रमाणे:-

**"पृथ्वीचा होत असलेल्या हानीला थांबविणे एवढेच पुरेसे नसून, पृथ्वीला पर्यावरण ऱ्हासाच्या संकटापासून वाचविण्याची वेळ आली आहे. वृक्ष लावा, पृथ्वीला वाचवा हा ऑलीम्पिकचा संदेश आहे."**

**"पृथ्वीचा ऱ्हास होण्यापासून वाचविण्याची वेळ आली आहे. त्यासाठी पृथ्वीवर होणारे आक्रमण नुसतेच थोपवायचे नसून पूर्णपणे थांबवायचे आहे. चला, एकत्र येऊन पृथ्वी वाचवूया. आपण प्रत्येकाने एक रोपटे लावण्याचा संकल्प करूया."**

ऑलीम्पिक स्पर्धेच्या उदघाटनाच्यावेळी सहभागी खेळाडूंकडून एक बीज लावून घेण्यात आले. ध्वजवाहकाच्या पुढे चालणाऱ्या प्रत्येक मुलाच्या हातामध्ये छोटे रोप होते. तसेच सायकल रॅलीमध्ये वृक्षारोपणाचे महत्त्व व पृथ्वीला वाचविण्याचा संदेश देणारा फलक होता.

वरील संदेशातून वृक्ष लागवडीचे महत्त्व अधोरेखित होत असून त्यातून पृथ्वीचे व पर्यावरणाचे रक्षण करण्याची साद दिली जात आहे.

४. या पार्श्वभूमीवर वृक्षारोपणाची गती तुटू न देता ती पुढे सुरू ठेवणे अत्यंत आवश्यक आहे. यासाठी पुढील ३ वर्षामध्ये ५० कोटी वृक्षारोपणाचे उद्दिष्ट संदर्भाधीन क्र.(३) येथील महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे. तसेच या कार्यक्रमांच्या अंमलबजावणीबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत.

वर्ष २०१६ मध्ये वृक्ष लागवडीबाबत वन विभागास ७५ टक्के व अन्य शासकीय विभागांना एकत्रित २५ टक्के उद्दिष्ट निश्चित केले होते. त्याचआधारे पुढील ३ वर्षांसाठी वन विभाग आणि अन्य शासकीय विभाग यांच्याकरिता वृक्ष लागवडीबाबत उद्दिष्ट संदर्भाधीन क्र. (३) येथील शासन निर्णयान्वये निश्चित केले आहे. त्यानुसार **शालेय शिक्षण व क्रीडा विभागास ३ वर्षांसाठी एकूण ९.५० कोटी इतके उद्दिष्ट ठरवून दिले असून ते खालीलप्रमाणे आहे.:-**

**सन २०१७, २०१८ व २०१९ साठी वर्षनिहाय वाटप**

| वृक्षरोपणासाठी संभाव्य स्थळे | सन - २०१७ ( सर्व विभाग एकत्रित उद्दिष्ट ७५ लाख ) | सन - २०१८ (सर्व विभाग एकत्रित उद्दिष्ट २.५ कोटी ) | सन - २०१९ (सर्व विभाग एकत्रित उद्दिष्ट ६.२५ कोटी ) |
|---|---|---|---|
| स्थानिक स्वराज्य संस्थांच्या (जिल्हा परिषद/ नगरपरिषद इ.) प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, खाजगी अनुदानित प्राथमिक/माध्यमिक/ उच्च माध्यमिक शाळा, खेळांची मैदाने | ३,७५,००० | १२,५०,००० | ३१,२५,००० |

५. **महसूल व वन विभागाने संदर्भाधीन क्र. (३) येथील शासन निर्णयानुसार विभागास व** विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय नियंत्रक अधिकाऱ्यांना, उद्दिष्टानुसार क्षेत्रिय यंत्रणांना अंतर्गत वाटप करण्याची पूर्णत: मुभा दिली आहे. त्यानुसार शालेय शिक्षण व क्रीडा विभागास **सन २०१७, २०१८ व २०१९ साठी विहित केलेले उद्दीष्ट पूर्ण करण्याकरिता** शाळांच्या आवारात आणि शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांच्या आवारात **वृक्षारोपणाबाबत खालीलप्रमाणे उद्दीष्ट ठरवून देण्यात येत आहे.:-**

| वृक्षरोपणासाठीची ठिकाणे | सन - २०१७ (उद्दिष्ट ३,७५,०००) | सन - २०१८ (उद्दिष्ट १२,५०,०००) | सन - २०१९ (उद्दिष्ट ३१,२५,०००) |
|---|---|---|---|
| स्थानिक स्वराज्य संस्थांच्या (जिल्हा परिषद/ नगरपरिषद इ.) प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, खाजगी अनुदानित प्राथमिक/माध्यमिक/ उच्च माध्यमिक शाळा यांच्या आवारात, खेळांची मैदाने, शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिपत्या-खालील क्षेत्रिय कार्यालयांच्या आवारात | १० रोपे प्रत्येकी | २० रोपे प्रत्येकी | ३० रोपे प्रत्येकी |

शाळांच्या आवारात तसेच क्षेत्रिय कार्यालयांच्या आवारात वृक्षारोपणाबाबत वरीलप्रमाणे ठरवून दिलेल्या उद्दीष्टानुसार वृक्षारोपण करण्यात यावे. मात्र जागेची व पाण्याची उपलब्धता आणि हवामान या बाबी लक्षात घेऊन त्या त्या ठिकाणच्या शाळांच्या आवारात लावण्यात येणाऱ्या रोपांची संख्या कमी/जास्त करता येईल. मात्र कोणत्याही परिस्थितीत शालेय शिक्षण व क्रीडा विभागास ठरवून दिलेल्या उद्दीष्टाची पूर्तता करण्यात येईल याअनुषंगाने तेवढया संख्येने रोपे लावण्याची दक्षता घेण्यात यावी.

राज्यातील विनाअनुदानित/कायम विनाअनुदानित शाळा तसेच स्वयंअर्थसहायित शाळा यांना उद्दीष्ट विहित केले नसले तरी त्यांना त्यांच्या इच्छेनुसार शाळेच्या आवारात वृक्षारोपण करता येईल.

६. राज्यातील निरनिराळया भागांमध्ये पावसाची सुरूवात सर्वसाधारणपणे १५ जून नंतर वेगवेगळया वेळी होते. त्यामुळे त्या त्या वर्षाच्या पावसाचा अंदाज घेऊन विभागनिहाय आणि जिल्हानिहाय निश्चित केलेली उद्दिष्टे पूर्ण करण्याबाबत त्या त्या वर्षात परिस्थितीनुसार लवचिकता (Flexibility) राहील. तसेच वृक्षरोपणाच्या वर नमूद कालावधीतील निश्चित तारखा त्या त्या वर्षाचा पावसाळा सुरु होण्यापूर्वी कळविण्यात येतील असे महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन क्र.(३) येथील शासन निर्णयान्वये स्पष्ट केले आहे.

७. वृक्षारोपणाच्या कार्यक्रमांतर्गत कोणती रोपे लावण्यात यावी, ही रोप कोणाकडून उपलब्ध करुन घ्यावीत तसेच वृक्षारोपण कार्यक्रमाचा सुक्ष्म आराखडा तयार करणे, त्या त्या वर्षात वृक्ष लागवडीसाठी अक्षांश व रेखांशासह स्थळ निश्चिती करणे, निकषाप्रमाणे खड्डे तयार करणे, जुन-जूलै मधील वृक्ष लागवड, वृक्ष लागवडीचा प्रत्यक्षदर्शी अहवाल (Real Time Reporting) आणि वृक्षसंगोपन इत्यादीसंदर्भात महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन क्र.(३) येथील दि. १०/१०/२०१६ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार व विहित कालमर्यादेत कार्यवाही करणे आवश्यक राहील. याबाबत संदर्भाधीन दि.१०/१०/२०१६ च्या शासन निर्णयाचे अवलोकन करावे.

८. वृक्षारोपणाचा दृश्य परिणाम दिसून येण्यासाठी, संवर्धन, पाणीपुरवठा, जनावरांपासून रोपांचे संरक्षणासाठी जैविक किंवा तारांचे/प्लॅस्टीक कुंपण, कायमस्वरुपी देखभाल, निगा, जोपासना व संगोपन इत्यादी कामांचा नियोजन आराखडा तयार करुन त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी. या वृक्षांचे जिवंत राहण्याचे प्रमाण (Survival rate) किमान ८०% ते ९०% राहणेबाबत काळजी घेण्यात यावी.

९. राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळा, खाजगी अनुदानित शाळा यांच्या आवारात तसेच शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयांच्या आवारात वृक्षारोपण कार्यकमाचे राज्यस्तरावरील समन्वयन शिक्षण संचालक (प्राथमिक)/शिक्षण संचालक (माध्यमिक) यांनी करावे. विभागीय स्तरावरील समन्वयन संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांनी आणि जिल्हा स्तरावरील समन्वयन संबंधित शिक्षणाधिकारी (प्राथमिक)/ (माध्यमिक) यांनी करणे आवश्यक राहील. तसेच क्रीडा विभागाची क्षेत्रिय कार्यालये व क्रीडा संकुले यांच्या आवारात वृक्षारोपण कार्यक्रमाचे राज्यस्तरीय समन्वयन संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावे.

१०. यापुर्वीच्या वृक्षारोपण कार्यकमाची अंमलबजावणी व संनियंत्रण यासाठी महसूल व वन विभागाच्या संदर्भाधीन क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या राज्यस्तरीय, जिल्हास्तरीय व तालूकास्तरीय समिती पुढील ३ वर्षासाठी स्थायी समिती म्हणून कार्यरत राहणार असून त्यामध्ये आणखी काही सदस्यांचा समावेश करण्यात आला आहे. या समित्यांची कार्यकक्षा संदर्भाधीन क्र.(१) येथील शासन निर्णयात विहित केल्यानुसार राहणार आहे. सदर समितीमध्ये सदस्य असलेल्या शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी समितीच्या बैठकीस हजर राहून या वृक्षारोपणाच्या कार्यक्रमासाठी सहकार्य करावे.

११. वृक्षारोपणासंदर्भात जिल्हास्तरीय एकत्रित माहिती संबंधित शिक्षणाधिकारी (प्राथमिक)/ (माध्यमिक) यांनी या शासन निर्णयासोबतच्या **विवरणपत्र-१ आणि विवरणपत्र -२** मधील विहित प्रपत्रात संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक तसेच शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक) यांना सादर करावी. शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक) यांनी तसेच संचालक, क्रीडा व युवक सेवा यांनी प्रत्येक वर्षाची राज्यस्तरीय एकत्रित माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), नागपूर व सचिव (वने) यांना सादर करावी. तसेच याची प्रत प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा) यांना सादर करावी.

१२. प्रस्तूत वृक्षारोपण कार्यक्रमांतर्गत होणारा खर्च मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच आवश्यक तेथे सी.एस.आर. फंडातून तरतूद उपलब्ध करुन घ्यावी. निधी उपलब्धतेबाबत अडचण असेल अशा प्रकरणी मोफत रोपे उपलब्ध करुन देण्यासाठी, वन व सामाजिक वनीकरण विभागाशी समन्वय साधण्यात यावा. त्या विभागामार्फत मोफत रोपे उपलब्ध करण्यात आल्यास, त्याची आवश्यक नोंद आणि लेखा, संबंधित कार्यालय वन व सामाजिक वनीकरण विभाग यांच्यामार्फत ठेवण्यात यावा. तसेच याबाबतची माहिती प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर, सचिव (वने) **आणि शालेय शिक्षण व क्रीडा विभागास** पाठविण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०३०११७२८२७००२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramchandra Ganpat Gunjal

Digitally signed by Ramchandra Ganpat Gunjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=dc74b0493b4979ad0aa76763f873c23fa35ecb44970562d4aa14a832b6357e54, cn=Ramchandra Ganpat Gunjal
Date: 2017.03.01 17:30:22 +05'30'

**( रा.ग.गुंजाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सर्व लोकसभा/ राज्यसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य
२) सर्व विधानसभा/ विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य
३) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४) आयुक्त (क्रीडा व युवक सेवा), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
६) सर्व जिल्हाधिकारी,
७) सर्व आयुक्त, महानगरपालिका,
८) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
९) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई,
१०) संचालक (क्रीडा व युवक सेवा), महाराष्ट्र राज्य, पुणे
११) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२) शिक्षण संचालक(माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१३) शिक्षण संचालक (प्रौढ शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१४) संचालक, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे,
१५) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे,
१६) संचालक, महाराष्ट्र राज्य पाठयपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ(बालभारती), पुणे,
१७) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,
१८) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१९) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद,
२०) सर्व शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद,
२१) शिक्षण निरीक्षक, (उत्तर, दक्षिण, पश्चिम), मुंबई

**प्रत :**

१) मा. मंत्री (वित्त, नियोजन व वने) यांचे खाजगी सचिव,
२) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
३) प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक,

४) सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक

५) सह सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय,मुंबई

६) उप सचिव/ अवर सचिव (प्रशिक्षण), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

७) उप सचिव/ अवर सचिव (क्रीडा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई

८) महसूल व वन विभाग, फ -११,

९) निवड नस्ती- (एस.एम. १)

# विवरणपत्र – १

## Year----------- : Online Format For Tree Plantation

**District :**

**Primary / Secondary** **PIT Digging (Year -----------)**

| **Division** | **District** | **Taluka** | **Village** | **Compartment No/Gat. No.** | **Latitude - Longitude** | **Plantation Target** | **PITs/ Trench Achievement During the Month** | | | | **Total** | **Percentage of PITs Comleted** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | Feb | March | April | May | | |
| | | | | | | | | | | | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 |
| One Time Entry | | | | | | | | | | | = 8+9+10+11 | = 12/7∗100 |

**Planting**

| **Division** | **District** | **Taluka** | **Village** | **Compartment No/Gat. No.** | **Latitude - Longitude** | **Plantation Target** | **Total No. of PITs** | **Planting Achievement** | | | **Total** | **Percentage of Planting** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | | | First Week | Second Week | Third Week | | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | | | 10 | 11 |
| Linked with PIT Digging | | | | | | | | | | | | =10/7∗100 |

## विवरणपत्र-२

### जिल्हयाचे नाव :-

### सन २०१७ ते २०१९ या प्रत्येक वर्षामध्ये जून-जुलै महिन्यात केलेल्या वृक्षरोपणाची माहिती व वृक्षाचे जिवंत राहण्याचे प्रमाण याची आकडेवारी दर्शविणारे विवरणपत्र

( त्रैमासिक अहवाल )

| अ.क्र. | वृक्षारोपणासाठी निवडलेली स्थळे | वन व सामाजिक वनीकरण विभागाकडून प्राप्त झालेल्या रोपांची संख्या | वृक्षरोपणासाठी सहभाग घेतलेल्या यंत्रणा | दिनाक--------- रोजी लागवड केलेल्या रोपांची संख्या | जिवंत रोपांची संख्या व टक्केवारी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |
| | | | | | | |

- सही -
शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक)/
शिक्षण संचालक (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक)